**मा.मुख्यमंत्री / मा.उपमुख्यमंत्री / मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांच्या मंत्रालयीन कार्यालय व शासकीय निवासस्थान येथील वापराकरीता नविन दूरध्वनी जोडणी / अतिरीक्त दूरध्वनी पुरविणे / अतिरीक्त क्षमतेचे कार्ड पुरविणे / दूरध्वनींवर कॉलर आयडी / ईपीएबीएक्स दूरध्वनी यंत्रणा पुरविणे इत्यादी खरेदीसाठी समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः टिईएल-१०१७/प्र.क्र.४५/२०१७/२२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०८ मार्च, २०१७

**वाचा:**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.१ डिसेंबर,२०१६

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१७१/अर्थ-३, दि.१६ जानेवारी,२०१६

**प्रस्तावना :**

शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियम पुस्तिका संदर्भाधिन अनुक्रमांक-१ येथील शासन निर्णयान्वये प्रसिध्द केली आहे. सदर शासन निर्णयातील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागांनी त्यांच्या कार्यालयासाठी खरेदी करावी, अशा सूचना वित्त विभागाने संदर्भीय अनुक्रमांक-२ येथील परिपत्रकान्वये दिल्या आहेत. नियम पुस्तिकेच्या परिच्छेद क्रमांक-२.९.३ मध्ये नमूद केल्यानुसार सर्व प्रशासकीय विभागांना खरेदी प्रक्रिया पार पाडता यावी, यासाठी प्रत्येक प्रशासकीय विभाग / कार्यालयांतर्गत खरेदी समिती गठीत करावयाची आहे.

मा.मुख्यमंत्री/ मा.उपमुख्यमंत्री/मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांच्या मंत्रालयीन कार्यालय व शासकीय निवासस्थान येथील वापराकरीता नविन दूरध्वनी जोडणी/अतिरीक्त दूरध्वनी पुरविणे/अतिरीक्त क्षमतेचे कार्ड पुरविणे/दूरध्वनींवर कॉलर आयडी/ईपीएबीएक्स दूरध्वनी यंत्रणा पुरविणे इत्यादी खरेदी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग/का.२२ अंतर्गत विभागीय खरेदी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

सामान्य प्रशासन विभाग/का.२२ साठी खालीलप्रमाणे विभागीय खरेदी समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १ | सह सचिव, कार्यासन-२२, सामान्य प्रशासन विभाग | **अध्यक्ष** |
| २ | उद्योग सह संचालक (विभागीय कार्यालय) / प्रतिनिधी<br>उद्योग संचालनालय, मुंबई | **सदस्य** |

| | | |
|---|---|---|
| ३ | विभागीय अधिकारी (लेखा व कोषागारे विभाग) / प्रतिनिधी संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई / प्रतिनिधी | **सदस्य** |
| ४ | अवर सचिव, कार्यासन-२२, सामान्य प्रशासन विभाग | **सदस्य सचिव** |

नियम पुस्तिकेत विहित केलेल्या खरेदी कार्यपध्दीचा अवलंब करुन खरेदी संबंधात सर्व निर्णय समितीला घेता येतील. खरेदी प्रक्रियेच्या सर्व टप्प्यांची म्हणजे तपशिलवार वैशिष्टयांना अंतिम स्वरुप देण्यापासून ते निविदा प्रक्रियेनंतरच्या संबंधित सर्व निर्णयासाठी समिती जबाबदार राहील. तसेच सदर समितीने ई-निविदा प्रक्रियेद्वारे प्राप्त झालेल्या निविदांचे मूल्यांकन करुन त्यापैकी सुयोग्य निविदेची निवड करुन ती निविदा स्विकृतीसाठी विभाग प्रमुखांना (अ.मु.स. व मु.रा.अ.) शिफारस करावयाची आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०८१६१००८६५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahadeo Somaji Khandare

Digitally signed by Mahadeo Somaji Khandare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahadeo Somaji Khandare
Date: 2017.03.08 16:10:04 +05'30'

**( म. सो. खंडारे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अ.मु.स.व मु.रा.अ., सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नविन प्रशासकीय भवन, २ रा मजला, मुंबई
३. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई
४. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
५. उप सचिव (उद्योग-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव (अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव (आस्था), सामान्य प्रशासन विभाग, मत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती/का.२२.